**मुंबई वित्तीय नियम, १९७८ (भाग-१) (उप विभाग - १ ते ५) मधील वित्तीय अधिकारांसाठी विभाग प्रमुख घोषित करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय :- HCT-५२२४/३९३/प्र.क्र. ४८/का. चार**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २२/०४/२०२४.

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, विधि व न्याय, क्र. इएसटी२०११/२१७५/प्र.क्र.४५८/का.२, दि. १४/०३/२०११.

२) शासन परिपत्रक, विधि व न्याय, क्र. इएसटी२०११/२१७५/प्र.क्र.४५८/का.२, दि. ०१/०२/२०२३.

३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम(भाग-२) दि. १७/०४/२०१५.

४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम(भाग-२) दि. २०/०९/२०१९.

५) प्रबंधक (इनस्पेशन II), अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र .B(W)६००१ of २००८(SS-२०९)/९१२०७२८, दि. १८/०४/२०२४.

**प्रस्तावना :-**

विधि व न्याय विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये विभागाच्या अधिपत्याखालील प्रशासकीय कार्यालयातील अधिका-यांना विभाग प्रमुख,कार्यालय प्रमुख घोषित करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. तसेच,विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील शासन परिपत्रकानुसार वित्तीय अधिकार प्रदान करण्याबाबतच्या कोणत्याही बाबीच्या अनुषंगाने सुधारणा करावयाची असल्यास अथवा विभाग प्रमुख कार्यालय प्रमुख घोषित करावयाचे असल्यास संबंधित प्रशासकीय कार्यासनाने त्यांच्या स्तरावर कार्यवाही करावी,अश्या सूचना देण्यात आल्या आहेत.

संदर्भ क्र. ५ च्या प्रबंधक (इनस्पेशन II), अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे दि. १८/०४/२०२४ रोजीच्या पत्रान्वये मुंबई वित्तीय नियम, १९७८ (भाग-१) (उप विभाग-१ ते ५ मधील वित्तीय अधिकारांसाठी विभाग प्रमुख घोषित करण्याची विनंती करण्यात आली आहे. त्यानुसार उच्च न्यायालय, मुंबई साठी विभाग प्रमुख घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुषंगाने शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई करिता वित्तीय अधिकारांच्या प्रयोजनार्थ खालीलप्रमाणे विभाग प्रमुख घोषित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | प्रशासनिक विभाग प्रमुख | विभाग प्रमुख |
|---|---|---|---|
| १. | उच्च न्यायालय, मुंबई मुख्य पीठ | मा. प्रधान सचिव व विधि परामर्शी | प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई |
| २. | उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद खंडपीठ | मा. प्रधान सचिव व विधि परामर्शी | प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद |
| ३. | उच्च न्यायालय, मुंबई, नागपूर खंडपीठ | मा. प्रधान सचिव व विधि परामर्शी | प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपुर |

२. सदर अधिकार हे फक्त वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२ दि. १७/०४/२०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उप विभाग - १ ते ५ साठी लागू राहतील. सेवाविषयक बाबीसाठी हे आदेश लागू राहणार नाही.

३. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-एक मधील अनुक्रमांक १ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४२२१४५८४९७११२ असा आहे.हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2024.04.22 15:11:04 +05'30'

**( विलास गायकवाड )**
**विधि सल्लागार- नि- सह सचिव**

**प्रति,**

१. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. महाप्रबंधक,उच्च न्यायालय ,मुंबई.
३. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा/मुळ शाखा), मुंबई.
४. प्रबंधक (प्रशासन), अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.

५. प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर.
६. प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ,औरंगाबाद.
७. महालेखापाल-एक (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
८. महालेखापाल-दोन (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/नागपूर.
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२.वित्त विभाग (व्यय ५, विनियम), मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन अधिकारी, का.२,२३,२४,२५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवड नस्ती.